केंद्र शासन पुरस्कृत "National Programme for Dairy Development" कार्यक्रम राज्यात राबविणेबाबत.......

राज्यस्तरीय तांत्रिक व्यवस्थापन समितीचे गठन.

महाराष्ट्र शासन

कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

शासन निर्णय क्रमांकः एमएलके-२०१४/प्र.क्र.३७/पदुम ८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: ४ ऑगस्ट, २०१४.

संदर्भ :- १) केंद्र शासनाच्या कृषि विभागाचे पत्र क्र.१-१/२०१२-DP, दि.१५ मे, २०१४.

२) शासन समक्रमांकित दि.४ ऑगस्ट, २०१४ रोजीचा शासन निर्णय.

शासन निर्णय—

केंद्र शासनाने १२ व्या पंचवार्षिक योजनेंतर्गत National Programme for Bovine Breeding and Dairy Development (NPBBDD) हा कार्यक्रम संपूर्ण देशात राबविण्यास संदर्भाधीन क्र. १ पत्रान्वये प्रशासकीय मंजुरी दिली आहे. या कार्यक्रमांतर्गत सन २०१४-२०१५ या कालावधीत केंद्र शासनाने ३०९.०० कोटी निधीची तरतूद केली असून यापैकी रु.१०५.०० कोटी NPDD या कार्यक्रमाच्या वाटपासाठी उपलब्ध आहेत. संदर्भ क्र.२ अन्वये उपरोक्त कार्यक्रमांतर्गत राज्यात दुग्धव्यवसाय प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यासाठी शासनाने महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., मुंबई या यंत्रणेस राज्यस्तरीय दुग्धप्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा" म्हणून घोषित केले आहे.

राज्यस्तरीय दुग्धप्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेमार्फत उपरोक्त कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणा-या प्रकल्पांच्या संनियंत्रणाकरीता **"राज्यस्तरीय तांत्रिक व्यवस्थापन समिती"** स्थापन करण्याची

बाब शासनाच्या विचाराधीन होती. शासन या निर्णयान्वये खालीलप्रमाणे **"राज्यस्तरीय तांत्रिक व्यवस्थापन समिती"** स्थापन करण्यास मान्यता देत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) सचिव (पदुम) | - | अध्यक्ष |
| २) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास,महाराष्ट्र राज्य | - | सदस्य |
| ३) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य | - | सदस्य |
| ४) केंद्रीय पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ५) नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ६) वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., मुंबई | - | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :**

सदर समिती, राष्ट्रीय दुग्धविकास कार्यक्रमांतर्गत (NPDD) राज्यस्तरीय दुग्धप्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेमार्फत राबविण्यात येणा-या प्रकल्पांचे सनियंत्रण करीत तसेच प्रकल्पाच्या भौतिक आणि आर्थिक उद्दीष्टेपुर्तीचा वेळोवेळी आढावा घेऊन प्रकल्प पूर्णत्वास जाण्याच्या दृष्टीने योग्य ते मार्गदर्शन करील. सदर समितीची बैठक वर्षातून दोनदा (मार्च व सप्टेंबर) आयोजित करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०४१७५१३३८९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.08.04 17:49:15 +05'30'

( श. मा. साठे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति ,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४) मा. राज्यमंत्री (दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव
५) सचिव (पदुम) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
६) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे १.
७) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास ,महाराष्ट्र राज्य,वरळी, मुंबई १८.
८) केंद्रीय पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास मंत्रालय,कृषि भवन, नवी दिल्ली
९) नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२.
१०) वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२.
११) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., गोरेगाव (पू.) मुंबई ६५.
१२) सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,
१३) सर्व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,
१४) निवड नस्ती